सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत रु.३३६.९० लाख निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. ईगव्ह -०४२३/प्र.क्र.८१/१४-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक - ०७ ऑगस्ट, २०२३.

**संदर्भ :-** १) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र ४०/अर्थ-३, दिनांक १२/०४/२०२३.
२) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. ईगव्ह -०४२३/प्र.क्र.८१/१४-अे, दि. ११ मे, २०२३.
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/सं.प्र./ई-गव्हर्नन्स/ ३४५१-२७८२/२१३३१/२०२३, दि. २६ जून, २०२३.

**प्रस्तावना :-**

कृषि व पदुम विभागाचे (खुद्द), मंत्रालय तसेच कृषि आयुक्तालय व अखत्यारितील कार्यालयांचे संगणकीयदृष्ट्या बळकटीकरण व्हावे यासाठी राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ही योजना राबविण्यात येते. कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग (खुद्द) व कृषि आयुक्तालयामार्फत ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत विविध उपक्रम राबविण्यात येतात, तसेच विविध उपक्रमांचे नियोजन करण्यात येते. सदर योजनेंतर्गत मंजूर झालेली रक्कम कृषि विभाग (खुद्द) तसेच कृषि आयुक्तालय, पुणे यांना आवश्यकतेनुसार विभागून वितरीत करण्यात येते.

२. ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ही योजनांतर्गत योजना असून सन २०२३-२४ या वित्तीय वर्षामध्ये सदर योजनेसाठी (३४५१ २७८२) एकूण रुपये २५ कोटी अर्थसंकल्पित केले असून वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील परिपत्रकानुसार सन २०२३-२४ च्या अनिवार्य व कार्यक्रमखर्चासाठी अर्थसंकल्पीत तरतूदीच्या ७० टक्के म्हणजेच रु. १७.५० कोटी निधी प्रथम नऊमाहीकरिता राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रमासाठी विभागास उपलब्ध करुन दिला असून त्यानुसार राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रम राबविण्यास दि. ११ मे, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आलेली आहे. वित्त विभागाने विभागास वितरणास उपलब्ध करुन दिलेल्या निधीपैकी रु. ९९.४० लाख निधी संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये कृषि विभाग (खुद्द) यांस वितरीत करण्यात आलेला आहे.

सबब, कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र. ३ येथील प्रस्तावान्वये सादर केलेल्या मागणीच्या अनुषंगाने राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत उपलब्ध निधीच्या मर्यादेत रु.३३६.९० लाख निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२३-२४ मध्ये ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्याकरिता रु. ३३६.९० लाख (रुपये तीनशे छत्तीस लाख नव्वद हजार फक्त) निधी कृषि आयुक्तालय, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी पुढील बाबींसाठी खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे:-

(रु. लाखात)

| अ. क्र. | खर्चाची बाब | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| १. | T & M Model नुसार कार्यरत तांत्रिक मनुष्यबळाकरीता महाआयटी मुंबई यांना आगाऊ सेवाशुल्क अदा करणे. | ८०.०० |
| २. | ॲग्रीस्टॉक प्रकल्पाकरिता आवश्यक ४ तांत्रिक मनुष्यबळाचे माहे जुलै, २०२३ ते नोव्हेंबर, २०२३ या कालावधीतील आगाऊ सेवाशुल्क महाआयटी मुंबई यांना अदा करणे. | ४१.३४ |
| ३. | नमो प्रणाली विकसनाकरिता महाआयटी यांना द्यावयाचे सेवाशुल्क | ३४.१२ |
| ४. | हार्डवेअर (डेस्कटॉप, प्रिंटर, सर्व्हर, UPS व बॅटरी, टॅबलेट, स्कॅनर, इन्व्हर्टर, Laptop Precision cooling system, Cable, Printer Cartage / Tonner refiling, Printer parts, Pen drive, Hard disk इ.) दुरूस्ती व देखभाल करिता | ३०.०० |
| ५. | MS Team चे ३८ परवाना पुरवठा करिता सेवापुरवठादार यांचे सेवाशुल्क | ०.५९ |
| ६. | कृषि विषयक ॲप्लीकेशनच्या क्लाऊड व्यवस्थापनाकरिता दि.१५-०६-२०२२ ते दि. ३०.११.२०२२ या कालावधीचे सेवाशुल्क महाआयटी यांना अदा करणे | ११.७६ |
| ७. | कृषि विषयक ॲप्लीकेशनच्या Security Audit करीता सेवापुरवठादारास सेवाशुल्क अदा करणे | २.२४ |
| ८. | कनेक्टिव्हिटी-आयुक्तालय स्तरावरील नेटवर्किंग, कनेक्टिव्हिटी आगाऊ देयके, ब्रॉड बॅण्ड सेवा देणेसाठी Wi-Fi Router बाबत देयके, Firewall खरेदी, समांतर लीज्ड लाईन सुविधा, MS Team परवाने खरेदी / नुतनीकरण व तद्नुषंगिक साहित्य खरेदी | १४.०० |
| ९. | आयटी सल्लागार व तांत्रिक मनुष्यबळ यांचे माहे मार्च, २०२३ ते जून, २०२३ या कालावधीतील देय क अदा करणे | ३७.८५ |
| १० | महाॲग्रीटेक प्रकल्पाच्या तांत्रिक मनुष्यबळासाठीचे सेवाशुल्क महाआयटी मुंबई यांना अदा करणे | ८५.०० |
| | **एकूण** | **३३६.९०** |

२. या शासन निर्णयान्वये कृषि विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाकरिता रु. ३३६.९० लाख (रुपये तीनशे छत्तीस लाख नव्वद हजार फक्त) निधी वितरीत करण्यात आला असून तो पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ करिता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीतुन खर्ची टाकावा :-

**"मागणी क्र.डी-७**
**३४५१ सचिवालय- आर्थिक सेवा,**
**पंचवार्षिक योजनांतर्गत योजना**
**(०२) योजना**
**(०२) (०४) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम अंमलबजावणी**
**(कृषि) (३४५१ २७८२),१७ संगणक खर्च**

३. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या रु. ३३६.९० लाख निधीचे आयुक्त (कृषि) कार्यालयाकरिता कोषागारातून आहरण व वितरणासाठी आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे संदर्भाधीन शासन परिपत्रक क्र. . अर्थसं-२०२३/प्र.क्र ४०/अर्थ-३, दिनांक १२/०४/२०२३ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे .

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०७१७३४५३२८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH
BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2023.08.07 17:39:52 +05'30'

**( संतोष ब. कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे

**प्रत-**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव
२) मा.मंत्री (कृषि ), मंत्रालय यांचे खाजगी सचिव
३) मा. विरोधी पक्षनेता विधानसभा/ विधान परिषद, विधान भवन, मुंबई

४) सर्व मा. संसद सदस्य/महाराष्ट्र विधानसभा सदस्य /महाराष्ट्र विधानपरिषद सदस्य
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
६) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) महालेखापाल१/२ (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
१०) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई/अधिदान व लेखा कार्यालय मुंबई
११) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन ५ वा मजला, मुंबई
१२) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३) निवडनस्ती (१४-अे कार्यासन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.